“दिव्यांग कल्याण विभाग दिव्यांगांच्या दारी” हे अभियान प्रत्येक जिल्ह्यात राबविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**दिव्यांग कल्याण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : दिव्यांग-२०२३/प्र. क्र.५६/दि.क. २**

३१/३२/३५ “ए” विंग, मित्तल टॉवर,तिसरा मजला,
बॅरिस्टर रजनी पटेल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई- ४०००२१.
दिनांक : २२ ऑगस्ट, २०२३.

वाचा:-

१) दिव्यांग व्यक्ती (समान संधी, हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५.
२) दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६,
३) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: अपंग २०१३/प्र.क्र.२०१/अ.क. २, दि.२० फेब्रुवारी, २०१९,
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: शासाउ-१०.१०/प्र. क्र. ९६/१०/सा.उ., दि.१३ मार्च, २०२३.
५) शासन निर्णय, दिव्यांग कल्याण विभाग, क्रमांक दिव्यांग-२०२३/प्र.क्र.५६/दि.क.२, दि.२३ मे,२०२३.
६) शासन परिपत्रक, दिव्यांग कल्याण विभाग, क्रमांक दिव्यांग-२०२३/प्र.क्र.५६/दि.क.२, दि.२८ जुलै,२०२३.
७) शासन परिपत्रक, दिव्यांग कल्याण विभाग, क्रमांक दिव्यांग-२०२३/प्र.क्र.५६/दि.क.२, दि.०४ ऑगस्ट,२०२३.
८) शासन परिपत्रक, दिव्यांग कल्याण विभाग, क्रमांक दिव्यांग-२०२३/प्र.क्र.५६/दि.क.२, दि.०८ ऑगस्ट,२०२३.

**शासन परिपत्रक :-**

विविध प्रवर्गातील दिव्यांग बांधवांच्या अडचणी सोडविण्यासाठी जिल्हा स्तरावर शासनाचे सर्व विभागाचे अधिकारी, सर्व शासकीय यंत्रणा एकाच ठिकाणी उपस्थित राहून दिव्यांगांच्या तक्रारी जाणून घेऊन त्याच ठिकाणी कामाचा निपटारा करता येईल. याकरीता या विभागाचा शासन निर्णय दिनांक २३ मे २०२३ नुसार **"दिव्यांग कल्याण विभाग दिव्यांगाच्या दारी"** हे अभियान राबविण्यात येत असून विभागाच्या दिनांक २८ जुलै, २०२३ च्या शासन परिपत्रकान्वये सदर अभियान जिल्हा स्तरावर राबविताना अवलंब करावयाची कार्यपद्धती विशद करण्यात आलेली आहे. सदरहू परिपत्रकासोबत जोडलेल्या **“प्रपत्र ब”** मध्ये सर्व जिल्हयांमध्ये आयोजित करावयाच्या अभियानाचे वेळापत्रक देण्यात आलेले आहे.

२. तथापि, अभियानाचे मुख्य मार्गदर्शक मा.श्री.ओमप्रकाश ऊर्फ बच्चू कडू, मंत्रीपद दर्जा यांचे निर्देशानुसार यांनी दिनांक २८ जुलै,२०२३, दिनांक ०४ ऑगस्ट,२०२३ आणि दिनांक ०८ ऑगस्ट,२०२३ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये निश्चित करण्यात आलेले अभियानाचे वेळापत्रक खालीलप्रमाणे सुधारित करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **जिल्हयाचे नाव** | **शासन परिपत्रकान्वये निश्चित केलेले दिनांक** | **सुधारित दिनांक** |
|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** |
| १. | गडचिरोली | १३ ऑक्टोबर,२०२३ | २७ स्प्टेंबर,२०२३ |
| २. | वर्धा | २७ स्प्टेंबर,२०२३ | १३ ऑक्टोबर,२०२३ |
| ३. | सातारा | २३ ऑगस्ट,२०२३ | १६ ऑक्टोबर,२०२३ |
| ४. | रत्नागिरी | १८ ऑक्टोबर,२०२३ | १७ ऑक्टोबर,२०२३ |
| ५. | सिंधुदूर्ग | १७ ऑक्टोबर,२०२३ | १८ ऑक्टोबर,२०२३ |

३. सबब सर्व संबंधितांनी अभियानाच्या दिनांकामध्ये झालेल्या बदलाची नोंद घ्यावी. तसेच उक्त नमुद जिल्हयांव्यतिरीक्त इतर जिल्हयांनी संदर्भ क्र. ६, ७, ८ अन्वये निर्धारित केलेल्या दिनांकानुसार अभियानाचे नियोजन करावे.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०८२३१४२८२९७१३५ असा आहे. तसेच सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SAIPRASAD DATTAGOUD MUKDADWAR
Date: 2023.08.23 14:31:36 +05'30'

**( सा.द.मुकदाडवार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४) मा. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२..

५) मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा / विधान परिषद), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६) मा. श्री.ओमप्रकाश उर्फ बच्चू कडू, (वि.स.स.) मंत्री दर्जा,
७) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई ४०० ०३२,
९) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
१०) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपुर,
११) आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३) जिल्हाधिकारी (सर्व)
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद. (सर्व)
१५) आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
१६) जिल्हा पोलिस प्रमुख (सर्व)
१७) मुख्य कार्यकारी अधिकारी, नगरपालिका. (सर्व)
१८) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय.
१९) जिल्हा शल्य चिकित्सक. (सर्व)
२०) जिल्हा आरोग्य अधिकारी. (सर्व)
२१) जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद. (सर्व)
२२) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
२५) जिल्हा कोषागार अधिकारी. (सर्व)
२६) निवडनस्ती.